ई - साहित्य प्रकाशन
वर्ष दुसरे, अंक १५, दिनांक – १ मे २०१०

# गर्जा महाराष्ट्र माझा !!

# महाराष्ट्र - ५०

# १९६० - २०१०

सर्व महाराष्ट्रवासीयांना नेटाक्षरीच्या संपुर्ण टीम तर्फ़े
**सुवर्ण महोत्सवी वर्षाच्या** हार्दिक शुभेच्छा !

# नेटाक्षरी

संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
भारती सरमळकर (मुंबई)
सचिन काकडे (मुंबई)

# नेटाक्षरी



भारतातील अर्थिक आणि सांस्कृतीक केंद्र स्थान असणारे आपले महाराष्ट्र राज्य १ मे १९६० रोजी अस्तित्वात आले. मराठी भाषिकांचे अस्तित्व असणा-या प्रदेशाला स्वतंत्र संयुक्त राज्याचा दर्जा मिळावा यात संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे फ़ार मोठे योगदान आहे. १०५ हुतात्म्यांच्या बलीदानानंतर मिळालेला महाराष्ट्र ही स्वस्तात मिळालेली देण नाही याची प्रत्येक महाराष्ट्रीय नागरिकाला जाणीव करून देणारे हुतात्मा स्मारक आजही मुंबईच्या फ़्लोरा-फ़ाउंटन उर्फ़ हुतात्मा चौकात अभिमानाने उभे आहे, संयुक्त महाराष्ट्रासाठी लढलेल्या आचार्य अत्रे, प्रबोधनकार ठाकरे, सेनापती बापट तसेच त्या १०५ हुतात्म्यांना 'नेटाक्षरी' चा मानाचा मुजरा.

याच दिवशी असणा-या कामगार दिना निमीत्त या जगाच्या औद्योगिक प्रगतीचा आधार असणा-या 'मुळ' व्यक्तीला म्हणजेच राबत्या हाताला सलाम, या अंकातल्या कविता ही आम्ही या विषयांशी निगडीतच निवडलेल्या आहेत, आम्ही आशा करतो नेहमीप्रमाणे हा अंक सुद्धा आपल्या पसंतीस उतरेल.

**-संपादकीय मंडळ**

काव्यअक्षरी

## ते गिरणी कामगार

कालच एक बातमी ऐकली
गिरणी कामगारांच्या मुलांना मिळणार
७५ टक्के आरक्षण
गिरणीच्या जागी उभ्या रहाणा-या प्रत्येक व्यवसायात
अन सारं गिरणगांवच सुखावलं

थोडंसं मन गेलं भूतकाळात
आठवू लागलं सारं काही....
१९८२ चा संप आणि त्यात
नोकरी गेलेल्या कित्येक जणांचे
उघड्यावर पडलेले संसार ....
पण हे पहायला तेव्हा हे डोळे आले नव्हते ह्या जगात ....

ह्या डोळ्यांनी पाहिलं ते
गिरणीच्या जमिनी विकता याव्यात म्हणून
गिरण्यांना आग लावणा या
त्या गिरणी मालकांचे निष्ठूर चेहरे ....

अन ह्या डोळ्यांनी अजून एक गोष्ट पाहिलीय
त्या जळालेल्या गिरणीची राख
स्वतःचं नशीब मानून डोक्याला लावणारे
ते गिरणी कामगार ....

- चैताली म्हापसेकर

## ।। महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा ।।

लाल एस.टी. च्या खिडकितुन पहावा
धुरकट घासलेटच्या रीक्षातुन पहावा
भरगच्च आगगाडीच्या बोगीतुन पहावा
हेलकावणा-या शिडाच्या होडीतुन पहावा

महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा

देशावरच्या काळ्या आईत पहावा
कोकणच्या लालसर खाईत पहावा
वा-याच्या डोंग़रमाथी सळईत पहावा
सह्याद्रीच्या अतीदुर्गम घळईत पहावा

महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा

दख्खनच्या भल्यामोठ्या पठारात पहावा
अफ़जलखानाच्या निष्ठुर जठारात पहावा
शाहिस्तेखानाच्या तुटलेल्या बोटात पहावा
संताजी-धनाजीच्या शत्रुपक्ष गोटात पहावा

महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा

गांवढळ माणूसकीच्या शिव्यात पहावा
देहु-आळंदीच्या भक्तीपर ओव्यात पहावा
कोकणस्थ ब्राम्हणाच्या शिंच्यात पहावा
खोडसाळ पुणेकरांच्या पाट्यात पहावा

महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा

नाशिकच्या द्राक्षाने भरलेल्या गळ्यात पहावा
पश्चिमेच्या उसाने बहरलेल्या मळ्यात पहावा
एकशिक्षकी प्राथमिक शाळेच्या फ़ळ्यात पहावा
जख्खड म्हातारीच्या मोतिबिंदु डोळ्यात पहावा

महाराष्ट्र माझा डोळा भरुन पहावा

सरतेशेवटी

विदर्भाच्या आत्मघाती करुण शेतक-यात पहावा
लातुर किल्लारीच्या भुकंपग्रस्त नागरीकात पहावा
सुनामीच्या तडाख्यात बचावलेल्या बालकात पहावा
महाराष्ट्र माझा, सह्याद्रीच्या अभेद्य कातळात पहावा

- भुपेश कुंभार

## ।। महाराष्ट्र तोडणा-या दलालांनो ।।

मराठ्या तु जिवंत माणुस
नाहिस मुके जनावर रे
शहाणपणा शिकवावा लोकांना
वेळीच मराठ्या सावर रे

बखर खोलुन बघशील का ?
इतिहासपाने चाळशील का?
संताप तुला का येईना गड्या
शंडासम तु जगतो का ?

आठव राजे शिवछत्रपतींना
महातेज सुर्य शंभुराजांना
लक्ष्मीबाई ते बाजीरावांना
सावरकर, टीळक्म क्रांतींसिंहांना

धमण्यामधील रक्त तुझ्या
लाव्हा होऊनी दौंडु दे
राख करुनी गाड गनिमांना
चौफ़ेर मराठा उधळु दे

दे  एक नारा, एकच ईशारा
अखंड राष्ट्र, एक मराठा
महाराष्ट्र तोडणा-या दलालांनो
मुकाट आपुले घर गाठा

- बाजी दराडे

काव्याक्षरी

## ।। महाराष्ट्र माझा ।।

आशेचा हा देश रांगडा
घामाने भिजली माती
अंतरात या फुले उमलती
जरी आहे तगडी छाती
विस्तृत आहे विशाल आहे
पोसल्यात कित्येक जाती
धुमसणारी मशाल आहे
पाहिल्यात कातर राती
ज्ञानाचे भांडार यारहो
प्राचीन कलेशी नाती
सह्याद्रीचा उंच कडा अन
फेसाळणा-या समुद्रलाटा
गीत तयाचे गाती
राष्ट्र नव्हे या 'महा'राष्ट्र म्हणावे
ही ऐसी बुलंद ख्याती

- आनंद माने

# चारोळी अक्षरी

## ।। मराठी रक्त ।।

साता समुद्रापार गेलो पण मातीचा वास गेला नाही
ईंग्रजी वाचुन थकलो पण मराठीचा ध्यास गेला नाही

शेक्सपियरला कोळले पण तुकोबाची कास गेली नाही
थेम्समध्ये न्हायलो पण चंद्रभागेची आस गेली नाही

आल्प्सच्या शिखरात फ़िरलो पण मन शिवनेरीवरच राहीले
महायुध्दाच्या समरभुमीवरही फ़ुल मात्र शिवबालाच वाहिले

बल्जच्या खिंडीतही पराक्रम बाजीप्रभुंचाचाच आठवला
वाटर्लु पाहुन मनात मनात भाउंचा पानिपत साठवला

सर्वधर्म समभाव सांगताना मनात वैष्णवांची भक्ती केली
बायबल वाचतानाही मनात फ़क्त ज्ञानेश्वरीची उक्ती केली

- हरीश दांगट

# नेटाक्षरी

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

------------------------

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके
स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, हास्य नेटाक्षरी, बालनेटाक्षरी
व प्रसिद्ध झालेली ई-बुक्स
टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-3D

------------------------

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच
सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

**netaksharee@gmail.com**